**आष्टी उपसा सिंचन योजना ता.मोहोळ,जि.सोलापूर**
**सुधारीत प्रशासकीय मान्यता**

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६३२/(२४४/०९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई
दिनांक : ०१/११/२०१०.

पहावे : १) मकृखोविम निर्णय क्र.२९६/(१४५/९६)/प्रशा-२, दिनांक १०/१०/१९९६.

**प्रस्तावना :-**

सोलापूर जिल्हयातील मोहोळ तालुक्यातील आष्टी उपसा सिंचन योजनेस महाराष्ट्र कृष्णा खारे विकास महामंडळाने त्यांचे निर्णय क्र. २९६/(१४५/९६)/प्रशा-२, दिनांक १०.१०.१९९६ अन्वये (दरसूची १९९५-९६ वर आधारित) रुपये ४९५९.८१ लक्ष (रुपये एकोणपन्नास कोटी एकोणसाठ लक्ष एक्याऐंशी हजार फक्त) एवढया किंमतीस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती. आता दरसूचीतील भाववाढीमुळे, भुसंपादनाच्या दरातील वाढीमुळे तसेच पंपहाऊसकरीता इलेक्ट्रीकल लाईनचे स्थान बदलविणे व त्या अनुषंगिक इतर कामे इत्यादीमुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झालेली आहे. त्यासाठी प्रकल्पाचा सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रसताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी त्यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/२०८/(७५७/०८)/मोप्र-४/३८२७/दिनांक ११-६-२००९ अन्वये सादर केलेला असून, प्रस्तावास मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे सोलापूर जिल्हयातील मोहोळ तालुक्यातील आष्टी उपसा सिंचन प्रकल्पाच्या कामासाठी सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारित रु. ८३०३.९८ लक्ष (रुपये त्र्याऐंशी कोटी तीन लक्ष अठ्ठयाण्णव हजार फक्त) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ७१२२.०० लक्ष (रुपये एकाहत्तर कोटी बावीस लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ११८१.९८ लक्ष (रुपये अकरा कोटी एक्याऐंशी लक्ष अठ्ठयाण्णव हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.४ (२०१०-११) वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे सोलापूर जिल्हयातील मोहोळ तालुक्यातील अवर्षण प्रवण क्षेत्रातील ९००० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण २.१८ आहे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील

गुंतवणूका (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) आष्टी उपसा सिंचन मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा

५. हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१०११०११५५६३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

**( र. स. गुजर )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, जलसंपदा विभाग, पुणे.
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, भीमा कालवे मंडळ, सोलापूर. (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, उजनी कालवा वि.क्र.८, सोलापूर.
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ ) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (कृपातंल) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (म.प्र.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मध्यम प्रकल्प, कार्यासन संग्रहार्थ
निवड धारिका

**तक्ता क्रमांक १**

**आष्टी उपसा सिंचन प्रकल्प ता. मोहोळ, जि.सोलापूर**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६३२/(२४४/०९)/म.प्र दि. १.११.२०१० चे सहपत्र**

**सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | 'अे'प्राथमिक सर्वेक्षण | ६०.२७ |
| २) | 'बी' भूसंपादन | ३६६.१७ |
| ३) | 'सी' कामे | ३९३४.९८ |
| ४) | 'डी' विमोचक | ३७.६१ |
| ५) | 'ई' फॉल्स | ---- |
| ६) | 'एफ' आर.एच.टी.कामे | ५४०.३३ |
| ७) | 'जी' ब्रिजेस | २६३.५९ |
| ८) | 'एच' एस्केप | ---९.५० |
| ९) | 'के' इमारती | १४.५८ |
| १०) | 'एल' मातीकाम | ८२९.२६ |
| ११) | 'एम' वृक्षारोपण | ३.९४ |
| १२) | 'ओ' संकिर्ण | २६.४५ |
| १३) | 'पी' देखभाल व दुरुस्ती | ०.८१ |
| १४) | 'क्यू' हत्यारे व संयत्रे | ------ |
| १५) | 'आर' दळणवळण | ३२.११ |
| १६) | वाय लॉस ऑन स्टॉक | १२.४० |
| १७) | वितरीका भाग-३ | ९९०.०० |
|  | एकूण कामाप्रित्यर्थ | ७१२२.०० |
|  | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ११८१.९८ |
|  | **एकूण** | **८३०३.९८** |

## तक्ता क्रमांक २

## आष्टी उपसा सिंचन प्रकल्प ता.मोहोळ, जि. सोलापूर

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६३२/(२४४/०९)/म.प्र, दि. १.११.२०१० चे सहपत्र**

**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३. |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे<br>३) वितरीका | <br>४०४४.४९<br>२०८७.५१<br>९९०.०० |
| | **एकूण (अ)** | **७१२२.००** |
| (ब) | **अधिक**<br>१) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) १० टक्के<br>२) हत्यारे व अवजारे १.०० टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ३.५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>१००६.६२<br>६७.५५<br>३५.२३<br>---- |
| | **एकूण (ब) (३ +४ +५ +६)** | **११०९.४०** |
| | **एकूण (अ+ब)** | **८२३१.४०** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>--<br><br>--<br>-- |
| | **एकूण वजाती** | **(-) ०.००** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **८२३१.४०** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ८.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्के (ब जमीन व क्यु हत्यारे वगळून)<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>०.००१<br>६७.५५<br><br>५.०३ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **७२.५८१** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **८३०३.९८** |